औद्योगिक प्रशिक्षण संस्था,औंध-पुणे,जि.पुणे या जिल्हास्तरीय ५० वर्षापेक्षा जुन्या संस्थांचे नुतनीकरणासाठी लागणा-या रु.९२,०१,४००/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास मंजुरी देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्रमांक प्रशामा-२०१०/(६९ /१०)व्यशि-२अर्थसं,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई- ४०० ०३२.
दि. १५ जून, २०१०.

संदर्भ :- व्यवसाय प्रशिक्षण संचालनालयाचे पत्र क्र.१५/औंध-पुणे/नुतनीकरण/२०१०/०४, दि.४.२.२०१०.

**प्रस्तावना :-** औद्योगिक प्रशिक्षण संस्था, औंध-पुणे, जि.पुणे ही संस्था १९४६ या शैक्षणिक वर्षापासून सर्वसाधारण (जनरल) उपयोजनेखाली सुरु करण्यात आली. संस्थेत ३६ व्यवसायांचे प्रशिक्षण देण्यात येत असून विद्यार्थी प्रवेश क्षमता २००० एवढी आहे. संस्थेकरीता १३.३६ हेक्टर (३२ एकर) शासकीय जमीन ताब्यात घेतलेली आहे. ही राज्यातील सर्वात जुनी व मोठी संस्था आहे. संस्थेमध्ये विविध व्यवसायामधून दरवर्षी २००० प्रशिक्षणार्थी प्रशिक्षण घेतात. संस्थेमध्ये विविध प्रशिक्षण कार्यक्रमासाठी कारखान्यातील कारागिर तसेच निदेशक कर्मचारी प्रशिक्षण घेतात, संस्थेतील वसतिगृहात ग्रामीण भागातील व गरीब कुटुंबातील ६०० प्रशिक्षणार्थी राहतात. त्यामुळे वसतिगृहाचे नुतनीकरण करणे गरजेचे आहे. त्यामुळे वसतिगृहाचे नुतनीकरण करणे, कार्यशाळा व प्रशासकीय इमारत, निवासस्थाने,संरक्षक भिंत इत्यादीच्या दुरुस्तीचे खर्चाचे अंदाजपत्रक सा.बां.विभागाकडून तयार करुन घेतलेले आहे. सदर अंदाजपत्रकात खालीलप्रमाणे कामे दर्शविलेली आहेत-

खोदकाम करणे, जुने सिमेंट पत्रे व बांधकाम काढणे, जुनी फरशी व कॉंक्रीट काढणे, जुने दरवाजे व खिडक्या काढणे, राडारोडा उचलणे, कॉंक्रीट करणे, वीट बांधकाम व प्लॅस्टर करणे, स्लॅब टाकणे त्यामध्ये स्टील वापरणे, तळमजला व डॅडोकरीता व्हेट्रीफाईड टाईल बसविणे, स्वच्छतागृहास तळजमीन व डॅडोकरीता सिरॅमिक टाईल्स वापरणे. पॅसेजमध्ये कोटा बसविणे व त्यास मिरर पॉलिश करणे, ओटयास कडप्पा व ग्रेनाईट बसविणे, दरवाजा चौकट व खिडक्यांचे जॅमला ग्रिनमार्बल बसविणे, बाहेरील बाजूस पेव्हींग ब्लॉक बसविणे, स्टील सिंक बसविणे, १५ मीमी व २५ मीमी व्यासाची पाण्याची नलिका बसविणे, मिक्सर कॉक बसविणे, वॉश बेसिन, संडास भांडी बसविणे, १५० मीमी आर सीसी पाईप व चेंबर बांधणे, न्हानी ट्रॅप व पिव्हीसी पाईप बसविणे, ट्री मिक्स फ्लोरिंग करणे, लाकडी दरवाजे, लोखंडी खिडक्या व ॲल्युमिनीयम खिडक्या बसविणे, लोखंडी ग्रिल बसविणे, फॉल सिलींग करणे, गर्डर परलीन व कैची करीता लोखंडी अँगल वापरणे, सिमेंट पत्रा बसविणे, रंगरंगोटी करणे. इत्यादी कामाचे अंदाजपत्रक सन २००८-०९ सालाच्या दरसूचीवर आधारित असून आवश्यक बाबींसाठी जादा दराने पृथककरण केले आहे. तसेच पुणे महानगरपालिका क्षेत्राचे ५.७५ ज्यादा दर विचारात घेऊन रु.९९,८९,६१६/- एवढया खर्चाचे अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, पुणे-१ यांनी तयार करण्यात आले आहे.

**शासन निर्णय -** **औद्योगिक** प्रशिक्षण संस्था, औंध-पुणे,जि.पुणे या जिल्हास्तरीय ५० वर्षापेक्षा जुन्या संस्थेतील प्रशासकीय इमारतीचे वसतिगृह व निवासस्थानाच्या नुतनीकरणासाठी लागणा-या **रु.९२,०१,४००/-(ब्यानव लाख एक हजार चारशे फक्त)** इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

१. उपभोक्ता विभाग म्हणून सदर अंदाजपत्रक व्यवसाय प्रशिक्षण संचालनालयातील संबंधीत जबाबदार अधिका-यांनी साक्षांकित करावे.

२. अंदाजपत्रक सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित आहे. चालू दरसूचीसाठी ७.५०% जादा रक्कम प्रस्तावित करण्यात येत आहे.

३. अंदाजपत्रकातील फर्निचर आणि सेन्टेज खर्च पूर्णतः वगळण्यात येत आहे.

२. सदरच्या प्रस्तावावरील खर्च हा मागणी क्र.४२५०-इतर सामाजिक व सामुहिक सेवावरील भांडवली खर्च, २०१, कामगार शिल्प कारागिर प्रशिक्षण, पंचवार्षिक योजनातंर्गत योजना,इमारती (००) (०१) मुख्य बांधकामे (४२५० ००१६) या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा. परंतु त्यासाठी अर्थसंकल्पात योग्य ती तरतूद केल्या शिवाय बांधकाम सुरु करु नये.

३. प्रस्तुत आदेश शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक विअप्र.१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या वित्तीय अधिकार नियम १९७८, भाग पहिला, उपविभाग ५, मधील अनुक्रमांक १ अन्वये सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४, अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार व सार्वजनिक बांधकामाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५३/इमारत ३, दि. ३.४.२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक 201006171935O3001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

( सं.अ.बागेश्वर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत :
संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई-१.
सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, पुणे.
जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी कार्यालय,पुणे
प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, औंध-पुणे,जि.पुणे.
महालेखापाल - II (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई-१/ नागपूर-२
महालेखापाल - II (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई-१/नागपूर-२
जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन व विकास समिती,पुणे.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे (नकाशा व अंदाजपत्रकासह) (संचालक (प्रशिक्षण) यांच्यामार्फत)
अधिदान व लेखा अधिकारी मुंबई.
सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई
नियोजन/ वित्त विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
निवड नस्ती / व्यशि-२ अर्थसंकल्प.